“नागरी संरक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई”
यांच्या आस्थापनेवरील संचालक, या अस्थायी पदास
मुदतवाढ मिळणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
**शासन निर्णय क्रमांक : सीडीएम-२०२०/प्र.क्र. ६३/विशा-८**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
**दिनांक :- २३ जून, २०२०**

वाचावे :

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : पदनि-२०१६/प्र.क्र. ८/१६/ आ.पु.क., दिनांक १२/०२/२०२०

२) गृह विभाग, शासन निर्णय क्र. सीडीएम-२०१९/प्र.क्र. ४९/ विशा-८, दि. १८.१०.२०१९

३) संचालक,नागरी संरक्षण, महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे पत्र क्रमांक : नासंसं/ का-३/प्र.क्र.४/ संचालक, २०२०/१७९ दि. २५/०२/२०२०

प्रस्तावना:

संचालक, नागरी संरक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई या अस्थायी पदास दि. ०१/१०/२०१९ ते दि. २९/०२/२०२० पर्यंत संदर्भ क्रमांक २ अन्वये मुदतवाढ देण्यात आली होती. सदर मुदतवाढ दि. २९/०२/२०२० रोजी संपली आहे. वित्त विभाग, शासन निर्णय, दि. १२/०२/२०२० अन्वये आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच, यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१/०३/२०२० ते दि. ३१/०८/२०२० पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना देण्यात आले आहेत. तसेच कोणत्याही परिस्थितीत कार्यालयांच्या आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घेऊन, सुधारित आकृतीबंधास उच्चस्तरीय समितीची मान्यता घेणे आवश्यक आहे. संचालक, नागरी संरक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई अस्थायी पदास दि. ०१/०६/२०२० ते दि.३१/०८/२०२० पर्यंत मुदतवाढ देण्याची बाब विचाराधीन होती. त्यास अनुसरुन शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

शासन निर्णय :-

संचालक, नागरी संरक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई (संवर्ग पद वेतनश्रेणी रू.२०५४००-२२४४००) अस्थायी या पदास दि. ०१/०६/२०२० ते दि.३१/०८/२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. या पदांवर होणारा खर्च मागणी क्र.बी.-१ मुख्य लेखाशीर्ष “२०७०-इतर प्रशासनिक सेवा (१०६) नागरी संरक्षण (तीन) राज्य नागरी संरक्षण संघटना-०१ वेतन” या लेखाशिर्षाखाली वर्ग करण्यात यावा. सदरचा खर्च वित्तीय वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभाग क्रःपदनि-२०१६/प्र.क्र. ८/आ.पु.क., दिनांक १२/०२/२०२० अन्वये अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्यांचा संकेताक क्र. २०२००७२११२१४४३१०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Deepak Vasant Sawant

Digitally signed by Deepak Vasant Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=43cdfecb6fd26ff7b1b970520962ebf72d86546b92151214820b2bb31f3ccac8, cn=Deepak Vasant Sawant
Date: 2020.07.21 14:23:38 +05'30'

**( दि.व. सावंत )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

सोबत : प्रपत्र-अ

प्रत:

१) संचालक, नागरी संरक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
३) महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई.
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६) वित्त विभाग (व्यय-८)/ वित्तीय सुधारणा-१, मंत्रालय, मुंबई.
७) निवड नस्ती, विशा-८.